**आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत शासकीय आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांसाठी भाजीपाला, मटन, चिकन, अंडी, केळी इ. ची खरेदी तसेच शासकीय वसतीगृहासाठीचे भोजन ठेके यासंदर्भातील ई-निविदा प्रक्रिया राबविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शाआशा- २०२०/ प्र.क्र.११७/का-१३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
दिनांक :- २१ ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, क्र.शाआशा-२०२०/प्र.क्र.११७)/का-१३-अ, दिनांक ३० डिसेंबर, २०२०

२) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्रमांकः शाआशा- २०२०/प्र.क्र.११७/का-१३, दिनांक २ मार्च, २०२३

३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.शाआशा-२०२३/प्र.क्र.३१/का-६(८)/२५८६, दिनांक १० एप्रिल, २०२३

४) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्रमांकः शाआशा- २०२०/प्र.क्र.११७/का.१३, दिनांक ८ मे, २०२३

५) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.शाआशा-२०२३/प्र.क्र.३१/का-६(८)/४४५२, दिनांक २७ जून, २०२३

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत शासकीय आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांसाठी भाजीपाला, मटन, चिकन, अंडी, केळी इ. ची खरेदी तसेच शासकीय वसतीगृहासाठीचे भोजन ठेके यासंदर्भातील एकसमान ई-निविदा प्रक्रिया आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या स्तरावरुन राबविण्यासंदर्भात संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये धोरण निश्चित करण्यात केलेले असून त्यामध्ये संदर्भ क्र. ४ अन्वये सूधारणा करण्यात आलेली आहे. प्रस्तुत शासनाच्या धोरणानुसार उक्त निविदा आयुक्तालयाच्या स्तरावरुन राबविणे आवश्यक आहे. मात्र, आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी संदर्भ क्र. ५ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार प्रस्तुत निविदा राबविण्याच्या कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केलेली पार्श्वभूमी विचारात घेता, शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना भाजीपाला, मटन, चिकन, अंडी, केळीचा पुरवठा करण्याच्या अनुषंगाने अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या अखत्यारित असलेल्या सर्व शासकीय आदिवासी आश्रमशाळांकरिता सबंधित अपर आयुक्त,

आदिवासी विकास यांच्या स्तरावरुन **तसेच** शासकीय वसतीगृहातील भोजन ठेकेसंदर्भातील ई-निविदा प्रक्रिया, आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या स्तरावरुन राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना भाजीपाला, मटन, चिकन, अंडी, केळीचा पुरवठा करण्यासाठी सबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, यांच्या अध्यक्षतेखालील समितीमार्फत **त्या - त्या** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालयांतर्गत असलेल्या सर्व आश्रमशाळांकरीता प्रकल्प निहाय ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

३. सदर निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.:-

| | | |
|---|---|---|
| १) सबंधित अपर आयुक्त,आदिवासी विकास | : | अध्यक्ष |
| २) उद्योग सह संचालक ( विभागीय कार्यालय) / प्रतिनिधी | : | सदस्य |
| ३) सहाय्यक आयुक्त ( वित्त), अपर आयुक्त,आदिवासी विकास | : | सदस्य |
| ४) सहाय्यक प्रकल्प अधिकारी ( शिक्षण ) अपर आयुक्त, आदिवासी विकास | : | सदस्य |
| ५) सबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या अखत्यारितील दोन प्रकल्प अधिकारी | : | सदस्य |
| ६) सहाय्यक आयुक्त, अपर आयुक्त, आदिवासी विकास | : | सदस्य सचिव |

४. उक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल.

अ) प्रकल्प हा भौगोलीक घटक मानुन प्रकल्प निहाय आधारभुत किंमत ठरविण्यात यावी.

आ) सदर समितीमार्फत शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना भाजीपाला, मटन, चिकन, अंडी, केळी यांचा पुरवठा करण्याकरिता प्रकल्प निहाय निविदा राबविण्यात यावी.

इ) मात्र, प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प सोलापूर, घोडेगांव, औरंगाबाद, कळमनुरी, अकोला, भंडारा, चिमुर, नागपूर व वर्धा या प्रकल्पांतर्गत असलेल्या शासकीय आश्रमशाळांमध्ये असलेले भौगोलिक अंतर व शाळांची अल्प संख्या विचारात घेता उक्त ठिकाणी आश्रमशाळानिहाय निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

ई) सदरील आश्रमशाळानिहाय निविदा प्रक्रिया राबवित असतांना प्रत्येक प्रकल्पांतर्गत त्यांच्या कार्यक्षेत्रात असलेल्या आश्रमशाळांना पुरवठा करावयाचा भाजीपाला, मटन, चिकन, अंडी, केळीच्या किंमतींपैकी सर्वात जास्त दर असणारी आश्रमशाळेचे दर, त्या प्रकल्पांतर्गत असलेल्या अन्य आश्रमशाळांच्या सरासरी दरांच्या ५ टक्के पेक्षा जास्त राहणार नाहीत, याची प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. ज्या आश्रमशाळेचे दर, सरासरी दरांच्या ५ टक्के पेक्षा जास्त असतील अशा आश्रमशाळेबाबत दरांच्या वाढीसंदर्भातील समर्थनीय कारणे नमूद करुन आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे प्रस्ताव सादर करावा. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी खरेदी धोरण विचारात घेऊन योग्य त्या समर्थनासह शासन मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करावा.

उ) निविदापूर्व बैठका घेणे, निविदाधारकांच्या शंकाचे निरसन करावे

ऊ) निविदेची जाहिरात प्रसिध्द करावी

ऋ) विहित दिनांकास तांत्रिक लिफाफे उघडून त्यांचे वाचन उपस्थित निविदाधारकांसमोर करावे.

५. शासनाचे प्रचलित नियम, निविदेतील अटी व शर्ती आणि उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय, दिनाक ०१.१२.२०१६ मधील सर्व तरतुदींचे पालन काटेकोरपणे करावी.

६. शासकीय वसतीगृहातील भोजन ठेकेसंदर्भातील ई-निविदा प्रक्रिया, संदर्भ क्र. २ व संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयातील तरतूदीप्रमाणे आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या स्तरावरुन राबविण्यात यावी.

७. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०८२२११४८४५८९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING
FATTESING
VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4f0e8608020fad0064f5bd3c615be5666dc0af54fcf5038cc18559d51a472ba, pseudonym=DDE30B7B971C12AC5E78F6BE2C672CA11B7A98CE, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2023.08.22 11:51:46 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
३) मा. उपमुख्यमंत्री ( गृह) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
४) मा. उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
५) मा.मंत्री ( आदिवासी विकास ), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२.
६) सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७) सर्व मा. विधानसभा सदस्य./विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, विधानभवन, मुंबई
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
११) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१२) निबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई, / नागपूर / औरंगाबाद खंडपीठ.
१३) सरकारी अभियोक्ता, मा .उच्च न्यायालय, मुंबई / नागपूर / औरंगाबाद. खंडपीठ
१४) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१५) सर्व जिल्हाधिकारी.
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
१७) अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.
१८) शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१९) शिक्षण संचालक ( प्राथमिक ) महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०) शिक्षण संचालक, (माध्यमिक ) महाराष्ट्र राज्य, पुणे.
२१) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

२२) महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२३) महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२६) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२७) सर्व उप सचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२८) सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२९) संचालक, अर्थ व लेखा, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
३०) उप सचिव ( व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१) सर्व मुख्याध्यापक, शासकिय आदिवासी आश्रमशाळा
३२) निवडनस्ती (का-१३)